**महाराष्ट्र राज्य सहकारी बँक मर्यादित सतत व समवर्ती लेखापरिक्षण योजना राबविण्यासाठी निर्माण केलेली २ अस्थायी पदे दि. ०१/०३/२०२३ ते ३१/०८/२०२३ पर्यंत चालु ठेवण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक: मरास ०२२३/प्र.क्र.४२/१८-स,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय, मुंबई-३२
दिनांक : १७ फेब्रुवारी, २०२३

वाचा:- १) शासन निर्णय, सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र. राजस १००८/प्र.क्र.५३८/५-स, दि. ०५.०५.२०११.
२) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे कार्यालय यांचे पत्र जा.क्र. आस्थापना/कक्ष-४/मरास बँक/मुदतवाढ/२०२३/४४, दि. ०९/०१/२०२३.
३) शासन निर्णय, सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र. मरास ०३२२/प्र.क्र.३२/१८-स, दि. ०४/१०/२०२२.
४) शासन निर्णय, वित्त विभाग, पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि. ०८/०२/२०२३.

प्रस्तावना :-

संदर्भाधीन शासन निर्णय क्र. १ अन्वये सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागातील स्थायी/ अस्थायी पदांच्या आढाव्यानुसार सहकार विभागाचा सुधारीत आकृतीबंध निश्चित करण्यात आला असून सदर आकृतीबंधामध्ये प्रस्तुत २१ पदांचा समावेश आहे. उपरोक्त वाचा क्र. ३ अन्वये, महाराष्ट्र राज्य सहकारी बँकांच्या सतत व समवर्ती लेखापरिक्षणासाठी निर्माण करण्यात आलेल्या २१ पैकी ०२ अस्थायी पदांना दि. २८/०२/२०२३ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास शासनाने मंजूरी दिलेली होती. सदरची मुदत वाढ संपुष्टात येत असल्याने त्या अनुषंगाने महाराष्ट्र राज्य सहकारी बँकांच्या सतत व समवर्ती लेखापरिक्षण योजना राबविणेबाबत लेखापरिक्षणासाठी निर्माण केलेली २१ पैकी ०२ अस्थायी पदे सन २०२३-२४ कालावधीसाठी पुढे चालू ठेवण्याबाबत ९७ व्या घटनादुरुस्तीच्या अनुषंगाने लेखापरीक्षण विभागास आवश्यकतेनुसार काम करण्यासाठी वर नमूद वाचा क्र. २ च्या पत्रान्वये सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे कार्यालयामार्फत प्रस्ताव शासनास सादर केला आहे. सदर बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :

सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था. महाराष्ट्र राज्य, पुणे, यांच्या उपरोक्त वाचा क्र. २ मधील प्रस्तावानुसार महाराष्ट्र राज्य सहकारी बँकांच्या सतत व समवर्ती लेखापरिक्षणासाठी निर्माण करण्यात आलेली खालील ०२ अस्थायी पदे कार्यरत आहेत. या पदांना **दिनांक ०१/०३/२०२३ पासून दिनांक ३१/०८/२०२३ पर्यंत या शासन निर्णयाव्दारे मुदतवाढीस मान्यता देण्यात येत आहे.**

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणी | पदसंख्या |
|---|---|---|---|
| १ | विशेष लेखापरीक्षक,वर्ग-१ | एस - २० : ५६१००-१७७५०० | १ |
| २ | लेखापरीक्षक श्रेणी-१ | एस - १४ : ३८६००-१२२८०० | १ |
| **एकूण पदे** | | | **२** |

या प्रित्यर्थ होणारा खर्च हा सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, मागणी क्र. व्ही-२ मधील अर्थसंकल्पीय लेखाशिर्ष "२४२५-सहकार, १०१-सहकारी संस्थांचे लेखापरीक्षण, १०१ (१) (ए) लेखापरिक्षणासाठी कर्मचारी वर्ग (२४२५ ०२२७)" या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ या आर्थिक वर्षासाठी केलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क, दिनांक ०८/०२/२०२३ अन्वये संबंधित प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या मुदतवाढीच्या अधिकारांतर्गत निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०२१७१६५२५०६५०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shrikrushna Anandrao Wadekar

Digitally signed by Shrikrushna Anandrao Wadekar
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7305071c9d8b281074f8452b1a671851b99ce164d8bd282bfeb775611d0eb87e, pseudonym=A9B19E68D73171B69896843593789CD99AC6DBD5, serialNumber=2711D1231BE138057C3C88E0EFB4B1CD5177AA9E3C71FCD2EDF6EC025114EB89, cn=Shrikrushna Anandrao Wadekar
Date: 2023.02.17 16:57:25 +05'30'

**( श्रीकृष्ण वाडेकर )**
**विशेष कार्य अधिकारी तथा सह निबंधक,**
**महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२) महालेखापाल -१ (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखापरिक्षण) महाराष्ट्र राज्य, मुंबई (३ प्रती)
३) महालेखापाल -२ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखापरिक्षण) महाराष्ट्र राज्य, नागपूर (३ प्रती)
४) विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था, (सर्व)
५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
७) जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर
८) सहनिबंधक, सहकारी संस्था (लेखापरिक्षण) , महाराष्ट्र राज्य , पुणे
९) सहनिबंधक, सहकारी संस्था (लेखापरिक्षण), महाराष्ट्र राज्य सहकारी बँक , मुंबई.
१०) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी बँक मर्या., मुंबई.
११) वित्त विभाग (व्यय-२) /(वित्तीय सुधारणा-१) /अर्थसंकल्प-१९ /व्यय-१४/अर्थसंकल्प-१२, मंत्रालय, मुंबई
१२) कार्यासन अधिकारी ५-स,/१२-स,/१७-स, सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
१३) विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था, मुंबई विभाग, मुंबई
१४) विशेष लेखापरिक्षक, सहकारी संस्था, वर्ग-२, महाराष्ट्र राज्य सहकारी बँक मर्या.,
१५) निवड नस्ती.